केंद्र शासनाच्या निर्देशाप्रमाणे राज्यात १८१ या टोल फ्री क्रमांकाच्या Chief Ministers Helpline बाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख- २६ फेब्रुवारी, २०२०.

वाचा :-

१. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दि.१९.८.२०१४.
२. शासन शुध्दीपत्रक, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दि.९.१०.२०१४.
३. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दि.९.३.२०१७.
४. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दि.१२.७.२०१७.
५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांच्याशी SAAR, IT, मुंबई यांनी केलेला दि.८.८.२०१७ चे करारपत्र.
६. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दि.२७.३.२०१८.
७. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.मबाविआ/मवि/का-६, BSNL/१८-१९/४०५६/ दिनांक-निरंक.
८. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दि.२६.६.२०१९.
९. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.बीजीटी-२०१९/प्र.क्र.९८/का-२, दि.१०.५.२०१९.
१०. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.मबाविआ/मवि/का-६, BSNL/२०१९-२०/२६०५/ दि.२४.५.२०१९.
११. उपायुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.मबाविआ/मवि/का-६/मवि/१८१/१९-२०/५५६, दि.३.२.२०२०.
१२. माहिती व तंत्रज्ञान विभाग यांचा दि.१६.१.२०२० रोजीचा ई-मेल.
१३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१९.

प्रस्तावना :-

संकटग्रस्त महिलांना तातडीने मदत पुरविण्यासाठी महिला व बाल विकास विभागामार्फत दि.१९.८.२०१४ च्या आदेशान्वये राज्यात SAAR IT RESOURCES PVT. LTD. या संस्थेच्या मदतीने संकटग्रस्त पिडीत महिलांना २४ तास माहिती उपलब्ध करु देण्यासाठीच्या १८१ या टोल फी क्रमांकाच्या “Chief Ministers Helpline” सुरु करण्यास शासनाने दि.१९.८.२०१४ च्या आदेशान्वये मंजूरी दिलेली आहे. सदरची हेल्पलाईन SAAR IT RESOURCES PVT. LTD., मुंबई या संस्थेच्या मदतीने राज्यात सुरु करण्यात आली आहे.

२. सदर १८१ हेल्पलाईन सुरु ठेवण्यासाठी बीएसएनएल, मुंबई यांना दरमहा दूरध्वनी देयके अदा केली जातात. त्यास अनुसरुन शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२०१३/प्र.क्र.२९०/का-२, दि.२९.३.२०१९ अन्वये माहे फेब्रुवारी, २०१९ पर्यंतची देयके अदा करण्यास आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना मंजूरी देण्यात आली आहे. आता, माहे मार्च, २०१९ ते फेब्रुवारी, २०२० या कालावधीतील एकूण १२ महिन्यांचे मानधन अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१८१ या टोफ फ्री क्रमांकाच्या “Chief Ministers Helpline” संदर्भात माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांच्याशी SAAR IT, मुंबई या संस्थेच्या झालेल्या दि.८.८.२०१७ च्या नवीन करारनाम्यानुसार, १८१ हेल्पलाईन साठी नियुक्त करण्यात आलेल्या SAAR IT मधील १८१ या टोफ फ्री क्रमांकाकरिता काम करणाऱ्या ८ कंत्राटी कर्मचाऱ्यांचे (३ शिफ्टमध्ये एकूण ५ (२+२+१) कर्मचारी तसेच प्राप्त कॉलचा अहवाल शासनास सादर करण्यासाठी ३ सुपरवायझर असे एकूण ८ कर्मचारी) मानधन अदा करण्यासाठी ₹३०,२४०/- प्रमाणे एकूण ₹२९,०३,०४०/- **(अक्षरी रुपये एकोणतीस लक्ष तीन हजार चाळीस फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरचा खर्च नियमानुसार हाईल याची आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई यांच्या दि.८.८.२०१७ च्या करारपत्रास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदरचा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, ००१ संचालनालय व प्रशासन, (०५) (०१) जनजागृती, प्रसिध्दी, प्रशिक्षण आणि मुल्यमापन (२२३५ ए ९०१) योजनांतर्गत योजना, २० इतर प्रशासकीय खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१.४.२०१९ रोजीच्या परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ ते १९ मधील मार्गदर्शक सूचना व त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२२७१७२८३७६२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.02.27 17:31:13 +05'30'

(र. सि. जरांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक, माहिती व तंत्रज्ञान महासंचालनालय, मुंबई
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. सर्व महिला व बाल विकास अधिकारी/ बाल विकास प्रकल्प अधिकारी
९. व्यवस्थापक, SAAR IT, मुंबई.